एतदर्थ मंडळाच्या मराठी भाषा उच्चस्तर परीक्षेत नैपुण्य मिळविणाऱ्या शासकीय अधिकाऱ्यांना व कर्मचाऱ्यांना प्रोत्साहनात्मक पारितोषिके देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांकः मभाप-२०९९/७०८/प्र.क्र.११२/९९/२०-ब,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १०.१०.२०००

वाचा : शासन निर्णय, क्रमांकः मभाप-१०८८/प्र.६/८८/बीस,
दि.२५ एप्रिल, १९८८

शासन निर्णय :

शासन निर्णय, क्र.मभाप-१०८८/प्र.६/८८/बीस, दि.२५.४.८८ अन्वये एतदर्थ मंडळाची उच्चस्तर मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण झालेल्या भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांना व राज्य शासन सेवेतील अन्य अधिकाऱ्यांना व कर्मचाऱ्यांना रु. १०००/- (रुपये एक हजार फक्त) प्रोत्साहनात्मक पारितोषिक देण्याचा निर्णय घेण्यात आला होता. सदर पारितोषिकाची रक्कम रु.१०००/- ऐवजी रु १२००/- एवढी करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत खालील अटींची पूर्तता करणाऱ्या एतदर्थ मंडळाची उच्चस्तर मराठी भाषा परीक्षा यापुढे उत्तीर्ण होणाऱ्या सर्व अधिकारी व कर्मचारी यांना प्रत्येकी रु.१२००/- (रुपये एक हजार दोनशे फक्त) प्रोत्साहनात्मक पारितोषिक देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

१) अनुज्ञेय ४ वर्षांच्या कालावधीत एतदर्थ मंडळाची उच्चस्तर मराठी भाषा परीक्षा पहिल्याच प्रयत्नात उत्तीर्ण झाले पाहिजे.

२) उच्चस्तर मराठी भाषा परीक्षेत एकूण गुणांच्या ७५ टक्के किंवा त्यापेक्षा जास्त गुण मिळाले पाहिजेत आणि

३) मराठी भाषा परीक्षा नियमान्वये एतदर्थ मंडळाच्या उच्चस्तर मराठी भाषा परीक्षेतून अन्यथा सूट मिळण्यास पात्र असता कामा नये.

२. या प्रोत्साहनात्मक बक्षीसासाठी होणारा खर्च संबंधित शासकीय अधिकारी व कर्मचारी काम करीत असलेल्या विभागाच्या/कार्यालयाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

२. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारी संदर्भ क्र.प्र.क्र.३३३/२०००/व्यय-४, दि. २१.७.२००० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(स्वाक्षरी)

(उ.प्र.महाजन)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मुख्य सचिवांचे सहसचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयीन विभागाचे सर्व प्रधान सचिव/सचिव,
प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय मुंबई (पत्राने),
प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय मुंबई (पत्राने),
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (पत्राने),
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राने),
प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकआयुक्त, मुंबई (पत्राने),
सर्व विभागीय आयुक्त,
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र - १, मुंबई,
महालेखापाल , लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र- २ , नागपूर,
महालेखापाल, लेखा परीक्षा , महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल , लेखापरीक्षा , महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे अधिकारी,
सामान्य प्रशासन विभाग/का.क्र.९,
वित्त विभाग, का.क्र.एएक्सपी-४,
सर्व मंत्रालयीन विभाग,
माहिती संचालक, महाराष्ट्र राज्य, प्रशासकीय इमारत, ५ वा मजला, शासकीय वसाहत,
वांद्रे (पूर्व), मुंबई - ४०० ०५१
मंत्रालयीन विभागांच्या अधीपत्याखाली असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयाचे प्रमुख
निवड नस्ती, सामान्य प्रशासन विभाग (२०-ब)